महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांचे आधुनिकीकरणांतर्गत बांधकाम व इतर सोईसुविधा यासाठी अर्थसंकल्पिय तरतूदीतून निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः क्रमांक: एसटीसी-१११४/प्र.क्र.-५५०/परि-१,**

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ३१ मार्च, २०१५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक एसटीसी-०५१४/प्र.क्र.२३०/परि-१, दि. १४.०८.२०१४.

२. शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक एसटीसी-०८१४/प्र.क्र.४७७/परि-१, दि. ०३.०१.२०१५.

३. शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक एसटीसी-१११४/प्र.क्र.५५०/परि-१, दि. १८.०२.२०१५.

४.महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाचे पत्र क्र.राप/स्थाअ/कामे/४७१९, दि. ०३.१२.२०१४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसस्थानकाचे आधुनिकीकरणाकरीता सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये रु.१२४६ लक्ष तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. यामध्ये नियोजित सिंहस्थ कुंभमेळा सन २०१५ करिता रु. ६८५ लक्ष व सिंहस्थ व्यतिरिक्त इतर कामांकरिता रु.५६१ लक्ष तरतूदीचा समावेश आहे. यापूर्वी वरील संदर्भाधिन वाचा-१, दिनांक १४.०८.२०१४ च्या आदेशान्वये रु. ४१५ लक्ष, वरील संदर्भाधिन वाचा-२, दिनांक ०३.०१.२०१५ च्या आदेशान्वये रु. ४३५ लक्ष व वरील संदर्भाधिन वाचा ३ दिनांक १८.०२.२०१५ च्या आदेशान्वये रु.१७१.६० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यानंतर महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाने दिनांक ०३/१२/२०१४ च्या पत्रान्वये निधी वितरणासाठी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्रमांक बी-३ लेखाशिर्ष ३०५५, मार्ग व परिवहन, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांच्या आधुनिकीकरणांतर्गत बांधकाम व इतर सोईसुविधा (३०५५ ००५२) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीच्या सिंहस्थ व्यतिरिक्त इतर कामांकरीता खालीलप्रमाणे तरतूद वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | वितरीत तरतूद (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १. | कडेगांव बसस्थानकाचे बांधकाम करणे | २१.४० |

३. वरीलप्रमाणे निधी वितरीत करण्यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांनी वित्त विभाग, मंत्रालय यांच्या दिनांक १७ एप्रिल, २०१४ रोजीच्या परिपत्रकातील निधी वितरणाबाबतच्या अटी व शर्तीचे पालन करुन पुढील कार्यवाही करावी.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भात क्र.१६१/१४६१, दिनांक ३०.०३.२०१५ व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१९३०३/व्यय-८, दिनांक ३१/०३/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०४०४११४०२२४८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash K Sabale

Digitally signed by Prakash K Sabale
DN: CN = Prakash K Sabale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.04 11:50:07 +05'30'

**(प्रकाश साबळे)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
३. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
७. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय -८/साऊ अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. नियोजन विभाग कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
१०. गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४), मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती.